**नगरपरिषद/नगरपंचायत यांना वितरीत करावयाचे सहायक अनुदान मालमत्ता कर व पाणीपट्टी यांच्या वसुलीच्या प्रमाणावर आधारित वितरीत करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीओ-२०१७/प्र.क्र.१२०/नवि-१४**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- ११ मे, २०१७

**वाचा:-** १. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-२००९/प्र.क्र.१०६/०९/नवि-१४, दि.३१.०८.२००९.
२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एमसीओ-२०१७/प्र.क्र.१६/नवि-१४, दि.०१.०२.२०१७

**प्रस्तावना:-**

राज्यातील नागरीकरणाचा वेग वाढता असून, सध्या राज्यातील सुमारे ५०% क्षेत्राचे नागरीकरण झाले आहे. वाढत्या नागरिकरणामुळे येणाऱ्या जबाबदाऱ्या व कर्तव्य स्वत:च्या आर्थिक क्षमतेवर नगरपरिषदांनी पार पाडणे अपेक्षित आहे. नागरी भागाच्या सुनियोजित व संपन्न विकासासाठी लोकाभिमुख नागरी प्रशासनाकडून महत्वाची भूमिका बजावली जाते. राज्यातील नागरी स्थानिक संस्था आर्थिकदृष्ट्या स्वयंपूर्ण असाव्यात व स्वत:च्या आर्थिक क्षमतेवर त्यांनी नागरिकांना मुलभूत सेवा पुरवाव्यात ही रास्त अपेक्षा आहे. या अनुषंगाने आर्थिक सक्षमता ही अत्यंत महत्वाची आहे.

२. राज्यातील नगरपरिषदांना देण्यात येणारे जकात अनुदान व महागाई भत्ता अनुदान बंद करण्यात येऊन, संदर्भ क्र.१ येथे शासन निर्णय दि.३१.०८.२००९ अन्वये राज्यातील नगरपरिषदांना “नगरपालिका सहायक अनुदान” देण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. या अनुदानाचा विनियोग त्यामध्ये नमूद करण्यात आलेल्या प्राथम्य क्रमानुसार करावयाचा आहे. या अनुदानामध्ये दरवर्षी १०% वाढ करून अनुदान उपलब्ध करून देण्यात येते.

३. शासन निर्णय दि.२५.०८.२०१४ अन्वये ज्या नगरपरिषदा/नगरपंचायतींची मालमत्ता व पाणीपट्टी कराची वसुली ९०% पेक्षा जास्त आहे. अशा नगरपरिषदांना त्यांच्या मंजूर आकृतीबंधातील कर्मचाऱ्यांच्या वेतन व निवृत्ती वेतनाएवढे १००% अनुदान मंजूर करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्याचप्रमाणे मालमत्ता कराची ९०% वसुली करणाऱ्या नगरपरिषदांना १३ व्या व १४ व्या वित्त आयोगातून मिळणाऱ्या रकमेचा कर्मचाऱ्यांच्या वेतन व निवृत्ती वेतनाकरिता उपयोग करण्यास अनुमती देण्याबाबत शासनाचे आदेश आहेत.

४. नगरपरिषदा/नगरपंचायतींचा मालमत्ता कर वसुली हा उत्पनांचा मूळ स्त्रोत आहे. त्याचप्रमाणे पाणीपट्टी कराची पूर्णत: वसुली होणे आवश्यक आहे. नागरी स्थानिक संस्था आर्थिकदृष्ट्या सक्षम होण्याच्या अनुषंगाने, त्यांनी मालमत्ता कर व पाणीपट्टी यांची प्रभावीपणे वसुली करणे आवश्यक आहे. त्यामुळे या नागरी स्थानिक संस्थांना विकासविषयक कामाकरिता निधीची उपलब्धता होऊ शकेल.

५. सर्वसाधारणपणे नागरिकांकडून कराचा भरणा वेळेत केला जातो. तथापि, काही नागरिकांकडून मालमत्ता कराचा भरणा टाळले जाते. सर्वसाधारणपणे सुमारे २०% नागरिकांकडून थकबाकीपैकी सुमारे ८०% रक्कम प्रलंबित असते. त्यामुळे, अशा थकबाकीदार नागरिकांकडून थकबाकीची रक्कम प्रभावीपणे वसूल करणे, हे नागरी स्थानिक संस्थांच्या आर्थिक सक्षमतेच्या दृष्टीने आवश्यक आहे.

६. उपरोक्त पार्श्वभूमीवर राज्यातील सर्व नगरपरिषदा/नगरपंचायतींमध्ये दि.०१.०२.२०१७ ते दि.३१.०३.२०१७ या कालावधीत मालमत्ता कर व पाणीपट्टी यांची १०० टक्के वसुलीची मोहिम राबविण्यात आली.

**<u>शासन निर्णय</u>:-**

राज्यातील नगरपरिषदा/नगरपंचायतींना सहायक अनुदानाबरोबरच विशेष रस्ते अनुदान, मुद्रांक शुल्क अनुदान, गौण खनिज अनुदान इत्यादी विविध प्रकारची अनुदाने देण्यात येऊन, या नागरी स्थानिक संस्थांना आर्थिकदृष्ट्या सक्षम करण्याबाबत शासन सातत्याने प्रयत्नशील असते. तथापि, शासनाचा असा अनुभव आहे की, या नागरी स्थानिक संस्था त्यांच्या दैनंदिन कामकाजाकरिता शासन अनुदानावर विसंबून असतात. वास्तविकत:, या नागरी स्थानिक संस्थांनी त्यांच्या उत्पनाचा मूळ स्त्रोत असलेल्या मालमत्ता कर व पाणीपट्टी कराची १००% वसुली करून, त्यातून त्यांच्या दैनंदिन गरजा भागवून शासनाकडून मिळणाऱ्या विविध प्रकारच्या अनुदानातून त्यांच्या क्षेत्रामध्ये विकासविषयक कामे करणे आवश्यक आहे. तथापि, या नागरी स्थानिक संस्थांकडून मालमत्ता कर व पाणीपट्टी कराची वसुली पूर्ण क्षमतेने होत नसल्याने, त्यांना देण्यात येणारे सहायक अनुदान हे संबंधित नागरी स्थानिक संस्था ज्या प्रमाणात मालमत्ता कर व पाणीपट्टी कराची वसुली करतील, त्या प्रमाणात देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

२. उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.०१.०२.२०१७ अन्वये नगरपरिषदा/ नगरपंचायती यांच्या मालमत्ता कर व पाणीपट्टी कर वसुलीची १००% वसूली करण्याबाबत राबविण्यात आलेल्या विशेष वसुली मोहिमेदरम्यान तेवढ्या प्रमाणात वसुली झाल्याचे दिसून येत नाही. त्यानुषंगाने शासन निर्णय दि.०१.०२.२०१७ अन्वये राबविण्यात आलेल्या विशेष वसुली मोहिमेस दि.३०.०६.२०१७ पर्यंत मुदतवाढ देणे व या मुदतवाढी अखेर वसूल करण्यात आलेल्या वसुलीवर आधारित सहायक अनुदान मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

(१) शासन निर्णय दि.०१.०२.२०१७ अन्वये राज्यातील नगरपरिषदा/नगरपंचायती यांच्या मालमत्ता कर व पाणीपट्टी कर वसुलीच्या राबविण्यात आलेल्या विशेष वसुली मोहिमेस दि.३०.०६.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

(२) राज्यातील नगरपरिषदा/नगरपंचायती मालमत्ता कर व पाणीपट्टी कर यांच्या सन २०१६-१७ या वर्षाची मागणी व थकीत वसुली यांची मागणी अशा एकूण मागणीच्या १००% वसुली करण्याबाबत राज्यातील नगरपरिषदा/नगरपंचायती यांनी उपरोक्त वाढीव मुदतीत प्रयत्न करावेत.

(३) विशेष वसुली मोहिमे अंतर्गत दि.३०.०६.२०१७ पर्यंत, एकूण मागणी रकमेपैकी प्रत्यक्षात वसूल करण्यात आलेल्या रकमेवर आधारित सन २०१७-१८ चे सहायक अनुदान नगरपरिषदा/नगरपंचायती यांना मंजूर करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्या अनुषंगाने संबंधित नगरपरिषदा/नगरपंचायती यांनी १००% वसुली होण्याबाबत प्रयत्न करावेत.

**३.** आयुक्त तथा संचालक, नगरपरिषदा प्रशासन संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त वसुली मोहिम सक्षमपणे राबविण्याच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करावी व संबंधित नगरपरिषदा/ नगरपंचायती यांना आवश्यक ते मार्गदर्शन करावे.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०५१२१५५२०००७२५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Jayasingrao N Patil
Date: 2017.05.12 16:27:04 +05'30'

(ज.ना.पाटील)
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
२. सर्व विभागीय आयुक्त.
३. सर्व जिल्हाधिकारी.
४. सर्व नगरपरिषदा/नगरपंचायती.
५. निवडनस्ती/नवि-१४.